**तालुका बीज गुणन केंद्र, कळंबु ता.शहादा, जि.नंदुरबार प्रक्षेत्राचे शासकीय फळरोपवाटिकेमध्ये अंशत: रुपांतर करण्यास मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: ताबिके-२०२२/प्र.क्र.७३/१३-अे**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: १३ जुलै, २०२३

**संदर्भ:-** कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/फलो-२/ताबीके/रुपांतरण/१९८९४/२०२२, दि.०२/०६/२०२२.

**प्रस्तावना:-**

संचालक (फलोत्पादन) यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सादर केलेल्या अहवालाप्रमाणे प्रस्तावित केलेल्या तालुका बीज गुणन केंद्र, कळंबु ता.शहादा, जि.नंदुरबार येथील प्रक्षेत्रावरील वातावरण हे आंबा, पेरु, सिताफळ व लिंबु या फळपिकांच्या लागवडीसाठी अत्यंत पोषक असून अक्राणी, नवापूर व अक्कलकुवा या तालुक्यातील जीवनमान हे मुख्यत्वे करुन फळपिकांवर अवलंबून आहे. खरीप हंगामात सदर तालुक्यात ज्वारी, बाजरी, तुर, मुग, उडीद या पिकांचा हंगाम असून खरीप हंगाम संपल्यानंतर डोंगराळ भागात सिंचन सुविधे अभावी आठ महिने रब्बी व उन्हाळी पिके घेता येत नाहीत. या परिस्थितीत येथील शेतकरी डोंगराळ भागात नैसर्गिकरित्या उपलब्ध असलेल्या सिताफळाची फळे तोडून रस्त्या-रस्त्यावर विक्री करुन उदरनिर्वाह करतात. मार्च महिन्यानंतर आंबा या फळपिकाच्या हंगामात कैऱ्यापासून आमसूल तयार करण्याचे काम मोठया प्रमाणात दिसून येते.

२. सिताफळ व आंबा या फळपिकांपासून चांगला रोजगार अथवा आर्थिक मोबदला शेतकऱ्यांना मिळत असतो. त्यामुळे आंबा, सिताफळ, लिंबु व पेरु या फळपिकांच्या कलमे/रोपांची मागणी शेतकऱ्यांमध्ये जास्त आहे. परंतु मागणीनुसार कलमे/रोपे उपलब्ध होत नसल्यामुळे काही शेतकरी घरच्या घरी रोपे तयार करुन लागवड करतात. परंतु त्यापासूनचे उत्पादन/उत्पन्न शिफारसीत वाणाच्या तुलनेत अत्यल्प आहे. तसेच शहादा, तळोदा व नंदुरबार या तालुक्यात केळी व पपई या फळपिकांचे लागवड क्षेत्र जास्त आहे. परंतु सद्यस्थितीत कमी बाजारभावामुळे व विपणनाच्या अपुऱ्या सोयी-सुविधामुळे या परिसरात आंबा, लिंबु, पेरु व सिताफळ या फळपिकांच्या लागवडीकडे शेतकऱ्यांचा कल दिसून येत आहे. अशा परिस्थितीत आंबा, पेरु, चिकु, सिताफळ या फळपिकांची रोगमुक्त सुधारीत व दर्जेदार कलमे/रोपे शेतकऱ्यांना उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. सबब रोपवाटिकेत अंशत: रुपांतर करण्याची निकड लक्षात घेता तालुका बीज गुणन केंद्र, कळंबु ता.शहादा, जि.नंदुरबार प्रक्षेत्राचे शासकीय फळरोपवाटिकेमध्ये रुपांतर करण्यासाठी मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

तालुका बीज गुणन केंद्र, कळंबु ता.शहादा, जि.नंदुरबार प्रक्षेत्राचे शासकीय फळरोपवाटिकेमध्ये रुपांतर करावयाचा तपशील खालीलप्रमाणे :-

| अ.क्र. | तालुका बीज गुणन केंद्राचे नांव | ता.बि.के. खालील एकूण क्षेत्र (हेक्टर) | फळरोपवाटिकेत रुपांतर करावयाचे क्षेत्र (हे.) |
|---|---|---|---|
| १ | तालुका बीज गुणन केंद्र, कळंबु ता.शहादा, जि.नंदुरबार | २६.७० हेक्टर | १६.८३ हेक्टर |

२. उपरोक्त तालुका बीज गुणन केंद्राच्या प्रक्षेत्रावर फळरोपवाटिका रुपांतर करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

१) तालुका बीज गुणन केंद्रात असलेल्या अधिकारी / कर्मचारी यांच्याकडूनच नविन फळरोपवाटिकेचे काम करून घेण्यात येईल. सदर फळरोवाटिकेसाठी नविन अधिकारी / कर्मचारी यांची पदनिर्मिती करता येणार नाही.

२) स्थापन करण्यात आलेल्या नविन फळरोपवटिकेसाठी कलमे /रोपे तयार करणे व इतर अनुषंगीक कामासाठी मुख्यलेखाशिर्ष २४०१ १७२२ मधील मंजूर तरतूदीमधून आवश्यकते प्रमाणे निधी उलब्ध करून देण्यात येईल.

३) फळरोपवाटीकेवरील मातृवृक्ष लागवड व इतर आवश्यक बांधकामे , सिंचनव्यवस्था आणि रोपवाटिकेच्या व्यवस्थापनासाठीचा खर्च मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०७१३१४४२३२८९०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2023.07.13 14:45:41 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषी), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. विभागीय कृषी सहसंचालक, नाशिक विभाग, नाशिक.
४. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, नंदुरबार.
५. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर,
६. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर,
७. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला,मुंबई-३२.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
११. निवड नस्ती (१३-अे)